क्रमांक

**जिवास धोका असल्याच्या प्रकरणी देण्यात आलेल्या पोलीस संरक्षण शुल्काची परिगणना करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
गृह विभाग
शासन परिपत्रक क्रमांक.एसएसए-१०१०/प्र.क्र.४/विशा-४
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : १२ मे, २०११.

**वाचा-** १) शासन परिपत्रक क्र.एसएसए-१०/२०००/१/विशा-४, दि. ३ जानेवारी, २०००.

## परिपत्रक

जीवास धोका असल्याच्या तक्रार प्रकरणी पोलीसांनी करावयाच्या कारवाईबाबत संदर्भाधीन दि. ३ जानेवारी, २००० च्या परिपत्रकान्वये मार्गदर्शक सूचना निर्गमित करण्यात आल्या आहेत. या परिपत्रकातील परिच्छेद (१५) (क) मध्ये संरक्षणाचा खर्च वसूल करताना प्रत्येक पदाचे सरासरी वेतन काढण्यासाठी सूत्र नमूद केले आहे. राज्य शासकीय कर्मचाऱ्यांना सहावा वेतन आयोग लागू केल्यानंतर कर्मचाऱ्यांच्या वेतनश्रेणीमध्ये बदल झाला असल्याने सदरहू परिपत्रकातील परिच्छेद (१५) (क) येथील सूत्राऐवजी प्रत्येक पदाचे सरासरी वेतन पुढील पद्धतीने निश्चित करावे.

अ) दि. १ जानेवारी, २००६ रोजी पाचव्या वेतन आयोगाप्रमाणे येणाऱ्या प्रत्येक पदासाठीच्या सरासरी मूळ वेतनाची परिगणना करण्यात यावी. या सरासरी मूळ वेतनाला १.८६ ने गुणून व येणारी रक्कम पुढील १० च्या पटीत घेऊन सुधारीत सरासरी वेतनाची परिगणना केली जावी. या वेतनामध्ये ग्रेड वेतन मिळवून येणारी रक्कम ही सहाव्या वेतन आयोगाप्रमाणे दि. १ जानेवारी, २००६ चे सरासरी मूळ वेतन ग्राह्य धरले जावे.

ब) उपरोक्तप्रमाणे परिगणित केलेल्या सरासरी मूळ वेतनामध्ये दरवर्षी १ जुलै रोजी ३ टक्के वाढ करण्यात यावी.

२. हे परिपत्रक वित्त विभाग अनौपचारीक संदर्भ क्र. १३२/सेवा-९, दि.१९/०३/२०११ अन्वये प्राप्त सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

P.T.O.

ROTA/H 776 (200-5-2011)1

३. हे परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध असून त्याचा संगणक संकेतांक २०११०५१२१६४३२६००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

( अं.शा. घार्गे )
उपसचिव, गृह विभाग, महाराष्ट्र शासन

प्रति,

पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई
सर्व विशेष पोलीस महानिरीक्षक,
सर्व पोलीस आयुक्त.
सर्व पोलीस पोलीस उपमहानिरीक्षक.
सर्व सहायक पोलीस महानिरीक्षक.
सर्व पोलीस अधिक्षक.
गृह विभाग, कार्यासन-बीयुडी-१, पोल-३, विशा-१-अ/ब, विशा-४, मंत्रालय, मुंबई.
वित्त विभाग, सेवा-९ कार्यासन, मंत्रालय, मुंबई.

--------